कातकरी, कोलाम व माडीयागोंड या आदिम जमातींसाठी भारतीय जीवन विमा निगम प्राधिकरणाची "जनश्री" विमा योजना लागू करण्याबाबत
पुरवणी मागणी रुपये ७०.०० लक्ष

**महाराष्ट्र शासन**
आदिवासी विकास विभाग
शासन निर्णय क्रमांक : आदिम-२००४/प्र.क्र.१२७ / का.१७
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक . ९ फेब्रुवारी,, २००५

**वाचा** : (१) संचालक (एन.जी.ओ.), केंद्र शासन यांचे पत्र क्रमांक-२२०४०/१०/२००४-NGO, (PTG), दिनांक १९.१०.२००४
(२) शासन निर्णय आदिवासी विकास विभाग. क्रमांक-बियुडी-२००४/प्र.क.५७/ पुरवणी मागणी/का.७, दिनांक ३.१.२००५.

**शासन निर्णय** : आदिवासी जमातींमध्ये कातकरी, कोलाम व माडीया गोंड या अति मागासलेल्या जमाती असल्याने त्याना आदिम जमाती म्हणून संबोधण्यात येते. अतिदुर्गम भागात या आदिम जमातींचे वास्तव्य आहे. त्यामुळे प्रसंगानुसार अनैसर्गिकरित्या त्यांचा मृत्यू होतो. ही वस्तुस्थिती विचारात घेऊन केंद्र शासनाच्या जनजातीय कार्य मंत्रालय, नवी दिल्ली यांनी या आदिम जमातींसाठी सामाजिक सुरक्षितता मिळावी या हेतुने भारतीय जीवन बिमा निगमची (Life Insuracnce Corporation of India Ltd.) "जनश्री" विमा योजना लागू करण्याचा निर्णय घेतला. यासाठी त्यांनी सन २००४-२००५ या वर्षी रूपये ५००/-प्रति कुटुंब याप्रमाणे एकूण रुपये ७०.०० लक्ष (रुपये सत्तर लक्ष फक्त ) एवढा निधी दिनांक १९ ऑक्टोबर, २००४ च्या पत्रान्वये उपलब्ध करुन दिलेला आहे. सदर योजना राज्यातील वरील आदिम जमातीच्या १४,००० कुटुंबांसाठी पाच वर्षाच्या कालावधीसाठी राबवावयाची आहे. केंद्र शासनाकडून प्राप्त झालेला रुपये ७०.०० लक्ष (रुपये सत्तर लक्ष फक्त) एवढा निधी अर्थसंकल्पित करण्यासाठी माहे डिसेंबर, २००४ च्या विधानमंडळाच्या अधिवेशनात पुरवणी मागणी सादर करण्यात आली होती. सदर पुरवणी मागणी मंजूर झाल्यानंतर महाराष्ट्र (तृतीय पुरवणी) विनियोजन अधिनियम, २००४ (सन २००४ चा महाराष्ट्र अधिनियम क्र १७) पारित झालेला आहे. त्यानुसार अर्थसंकल्पित झालेला रुपये ७०.०० लक्ष (रुपये सत्तर लक्ष फक्त) एवढा निधी आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक यांच्या अधिनस्त ठेवण्यात येत असून तो त्यांना सोबत जोडलेल्या विवरणपत्रानुसार खर्च करण्यास मंजूरी देण्यात येत आहे.

कातकरी, कोलाम व माडिया गोंड या आदिम जमातीच्या १४,००० कुटुंबांना सामाजिक सुरक्षितता मिळण्याच्या हेतुने केंद्र शासनाकडून केंद्रीय क्षेत्र योजनेंतर्गत वर नमूद केल्यानुसार प्राप्त झालेल्या व अर्थसंकल्पित केलेला रुपये ७०.०० लक्ष (रुपये सत्तर लक्ष फक्त ) एवढा निधी "जनश्री" योजना राबविण्यासाठी आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक यांना सदर निधी बायफ या स्वयंसेवी संस्थेस वितरीत करण्यास मंजूरी देण्यात येत आहे.

रु. ७०.०० लक्ष (रुपये सत्तर लक्ष फक्त) एवढा निधी "मागणी क्र. टि-४ , २२२५ - अनुसूचित जाती, जमाती व इतर मागासवर्गीयांचे कल्याण - पंचवार्षिक योजनांतर्गत योजना - जनजाती क्षेत्र उपयोजना-०२ - अनुसूचित जमातींचे कल्याण-८०० - इतर खर्च (०५) आदिम जमातीच्या विकासासाठी केंद्रीय क्षेत्र योजना (०१) (०५) केंद्र पुरस्कृत योजना (२२२५ ३००१) " या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या सहमतीने व

त्या विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र. १०३४/०४/व्यय-१४, दिनांक २.११.२००४ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

( दि. वा. जोशी )
कार्यासन अधिकारी

प्रत,

आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक.

अपर आयुक्त, आदिवासी विकास, ठाणे/ अमरावती /नागपूर

महालेखापाल (लेखा परिक्षा), महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपुर.

महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपुर.

प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, पेण, ता. पेण, जि. रायगड

प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, पांढरकवडा, ता. पांढरकवडा, जि. यवतमाळ

प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, अहेरी, ता. अहेरी, जि. गडचिरोली

प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, भामरागड, ता. भामरागड, जि. गडचिरोली.

सचिव, बायफ संस्था, बायफ मित्र भवन, बोधले नगरच्या मागे, नाशिक-पुणे महामार्ग, नाशिक

मुख्य कार्यकारी समन्वयक, बायफ संस्था, बायफ मित्र भवन, बोधले नगरच्या मागे, नाशिक-पुणे महामार्ग, नाशिक

जिल्हा कोषागार अधिकारी, नाशिक.

वित्त विभाग, (व्यय ११, अर्थ१७ अर्थोपाय) मंत्रालय, मुंबई-३२.

आदिवासी विकास विभागातील सर्व कार्यासने

निवड नस्ती.

******

(शासन निर्णय आदिम-२००४/प्र.क्र.१२७/का.१७, दिनांक ९ फेब्रुवारी, २००५ चे सहपत्र )

**विवरणपत्र**

| | |
|---|---|
| योजनेचे नाव | कातकरी, कोलाम व माडीया गोंड या आदिम जमातींसाठी भारतीय जीवन विमा निगमची "जनश्री" विमा योजना ५ वर्षांच्या कालावधीसाठी लागू करणे. |
| योजनेचे स्वरुप | या योजनेंतर्गत १४,००० आदिम जमातीच्या कुटुंबांच्या कुटुंब प्रमुखाची या योजनेचा सदस्य म्हणून नोंदणी करण्यात येईल, सदस्यांबाबतचे रजिस्ट्रेशन-कम- नॉमिनेशन फॉर्म जतन करण्यात येतील. अशा सदस्य गटाचा तपशील व मागणी प्रपत्रे (Claim Forms) आयुर्विमा महामंडळाकडे सदस्यत्व शुल्कासह सादर करण्यात येतील. त्यासोबतच पुढील ४ वर्षाचे नुतनीकरण शुल्कही भरण्याची व्यवस्था करण्यात यावी. |
| योजनेच्या अटी व शर्ती | दुधाचे उत्पादन करणारा, रिक्षा ओढणारा, ऑटो-रिक्षा चालविणारा चालक, गवंडी, शेतमजूर इ. व्यवसाय करणा-या वय वर्षे १८ ते ६० वयोगटातील वरील आदिम जमातींच्या कुटुंबातील व्यक्ती दारिद्र्य रेषेखालील किंवा दारिद्र्यरेषेच्या अंशत: वर असलेली असावी. |
| योजनेचे अंदाजपत्रक | प्रति सदस्य रुपये ५००/- याप्रमाणे एकुण १४,००० आदिम जमातीच्या कुटुंबांसाठी विमा हफ्त्याची रक्कम रु. ७०.०० लक्ष भरणे.<br>योजनेच्या सदस्यत्वाचे एकुण शुल्क रु. २००/- प्रति सदस्य प्रति वर्ष असेल. यातील प्रति सदस्य रु. १००/- एवढे शुल्क संबंधित अंमलबजावणी करणा-या संस्थेने (राज्य शासनाने ) भरावे उर्वरित रुपये १००/- भारतीय जीवन विमा निगम यांचेकडे असलेल्या केंद्र शासनाच्या सामाजिक सुरक्षा निधीतून परस्पर भरण्यात येतील. सदर योजनेची अंमलबजावणी बायफ या स्वयंसेवी संस्थमार्फत करण्यात यावी आदिम जमातींच्या १४,००० कुटुंब प्रमुखांसाठी सदर योजना सन २००४-०५ पासून पुढील ५ वर्षापर्यंत राबविण्यात येईल. |
| योजनेचे उद्दिष्ट | कुटुंबप्रमुखाच्या विम्याद्वारे आदिम जमातीच्या कुटुंबाना सामाजिक सुरक्षितता पुरविणे. |
| योजनेचे कार्यक्षेत्र व लाभार्थ्यांची संख्या | रायगड जिल्हयातील कर्जत व खालापूर तालुक्यातील कातकरी, यवतमाळ जिल्हयातील केळापूर, मारेगांव व झरीजामनी तालुक्यातील कोलाम आणि गडचिरोली जिल्हयातील एटापल्ली व भामरागड तालुक्यातील माडिया गोंड या आदिम जमातींसाठी वरील योजना राबविण्यात यावी.<br>प्रकल्प अधिकारी, पेण यांनी त्यांच्या कर्जत व खालापूर तालुक्यातील प्रत्येकी २००० कातकरी कुटुंबांची निवड करावी. प्रकल्प अधिकारी, पाढरकवडा यांनी केळापूर, मारेगांव व झरीजामनी तालुक्यातील प्रत्येकी २००० कोलाम कुटुंबांची निवड करावी. प्रकल्प अधिकारी, |

| | |
|---|---|
| | अहेरी यांनी एटापल्ली तालुक्यातील २००० माडियागोंड कुटुंबांची निवड करावी. प्रकल्प अधिकारी, भामरागड यांनी भामरागड तालुक्यातील २००० माडियागोंड कुटुबांची निवड करावी. अशा निवडलेल्या कुटुंबांची व त्या कुटुंबाच्या प्रमुखाची माहिती विहित प्रपत्रात गोळा करण्यात यावी. |
| योजनेचा कालावधी | ५ वर्षे (सन २००४-२००५ ते २००८-२००९) |
| योजनेचे फायदे | कुटुब प्रमुखाचा नैसर्गिक मृत्यू झाल्यास रुपये २०,०००/-, अपघाती मृत्यू झाल्यास रुपये ५०,०००/-, अपघातामुळे कायम स्वरुपी विकलांगता प्राप्त झाल्यास रुपये ५०,०००/- आणि अपघातामुळे अंशत: (Partial) कायम स्वरुपी विकलांगता प्राप्त झाल्यास रुपये २५,०००/- असा लाभ वरील "जनश्री" विमा योजनेतंर्गत मिळेल. |
| योजना राबविणारी यंत्रणा आणि त्याचे कार्य | बायफ हया स्वयंसेवी संस्थेने वरील योजना राबवावी. या संदर्भात सस्थंने पुढील बाबी कराव्यात --<br>१) या योजनेसाठी वर दर्शविलेल्या कार्यक्षेत्रातील आदिम जमातीच्या कुटुंबांच्या कुटुंब प्रमुखांची सदस्य म्हणून नोंदणी करावी.<br>२) सदस्यांची नोंदणी-नि-नामनिर्देशनपत्रे सुस्थितीत ठेवावीत.<br>३) सदस्य-समूहाच्या विमा योजनेचा हफ्ता भरल्याचा तपशील भारतीय जीवन विमा निगम यांना सादर करावा.<br>४) सदस्यांचे मागणी अर्ज (Claim Forms ) भारतीय जीवन विमा निगम यांना सादर करावे. याबाबत पाठपुरावा करुन बाधित सदस्यांच्या कुटुंबाना विम्याची रक्कम मिळवून देण्याची पूर्ण कार्यवाही करावी. त्याबाबतचा अहवाल दर तीन महिन्यांनी संबंधित प्रकल्प अधिकारी, ए.आ. वि. प्र., आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक आणि राज्य शासनास सादर करावा.<br>५) योजनेचे तसेच योजनेच्या हफ्त्यांचे नवीकरण (Renewal) करावे. |
| योजनेचे संनियंत्रण | बायफ ही स्वयंसेवी संस्था वरील योजना राबविणार आहे. वर नमूद केल्यानुसार संस्थेने वेळोवेळी कार्यवाही केल्याबद्दल आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक यांनी दर तिमाहीस आढावा घ्यावा व सविस्तर अहवाल शासनास सादर करावा. |

कातकरी, कोलाम व माडीयागोंड या आदिम जमातीसाठी भारतीय जीवन विमा निगम प्राधिकरणाची "जनश्री" विमा योजना लागू करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
आदिवासी विकास विभाग
शुध्दिपत्र क्रमांक : आदिम-२००४/प्र.क्र.१२७/का.१७
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक : १६ फेब्रुवारी, २००५

वाचा : शासन निर्णय, आदिवासी विकास विभाग, क्र.आदिम-२००४/प्र.क्र.१२७/का.१७, दि.९.२.२००५

शुध्दिपत्र : कातकरी, कोलाम व माडीया गोंड या आदिम जमातीसाठी भारतीय जीवन विमा निगमची "जनश्री" विमा योजना लागू करण्याबाबत प्रस्तावनेतील दिनांक ९.२.२००५ चा शासन निर्णय निर्गमित करण्यात आला. सदर शासन निर्णयातील परिच्छेद २ मध्ये "जनश्री" योजना राबविण्यासाठी आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक यांना सदर निधी बायफ या स्वयंसेवी संस्थेस वितरीत करण्यास मंजूरी देण्यात येत आहे," असे नमूद केलेले आहे.

२. आता शासन निर्णयातील परिच्छेद २ मध्ये वरील वाक्याऐवजी, "जनश्री" योजना राबविण्यासाठी आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक यांना सदर निधी **"केंद्रीय कार्यालय,"योगक्षेम" भारतीय जीवन विमा निगम, जीवन विमा मार्ग, मुंबई-४०० ०२१"** यांना वितरीत करण्यास मंजूरी देण्यात येत आहे," असे वाचावे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

( दि. दा. जोशी )
कार्यासन अधिकारी

प्रत,
आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक.
अपर आयुक्त, आदिवासी विकास, ठाणे/ अमरावती /नागपूर
महालेखापाल (लेखा परिक्षा), महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपुर.
महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपुर.
प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, पेण, ता. पेण, जि. रायगड
प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, पांढरकवडा, ता.पांढरकवडा, जि.यवतमाळ
प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, अहेरी, ता. अहेरी, जि. गडचिरोली
प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, भामरागड, ता. भामरागड, जि.गडचिरोली.
सचिव, बायफ संस्था, बायफ मित्र भवन, बोधले नगरच्या मागे, नाशिक-पुणे महामार्ग, नाशिक
केंद्रीय कार्यालय,"योगक्षेम" भारतीय जीवन विमा निगम, जीवन विमा मार्ग, मुंबई-४०० ०२१
मुख्य कार्यकारी समन्वयक, बायफ संस्था, बायफ मित्र भवन, बोधले नगरच्या मागे, नाशिक-पुणे महामार्ग, नाशिक
जिल्हा कोषागार अधिकारी, नाशिक.
वित्त विभाग, (व्यय ११, अर्थ१७ अर्थोपाय) मंत्रालय, मुंबई-३२.
आदिवासी विकास विभागातील सर्व कार्यासने.
निवड नस्ती.